२०१०१२३११८२७५९००१

**जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM)/ लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)/ केंद्र शासन पुरस्कृत एकात्मिक शहर विकास योजना (IDSMT) अंतर्गत मंजूर प्रकल्पांची कामे पूर्ण होण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना पूरक अनुदान व कर्ज उपलब्ध करुन देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
शासन निर्णय क्र.एनयुआर-२००९/प्र.क्र.१२७/०९/नवि-३३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ३१ ऑगस्ट,२००९

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाने नागरी भागातील लोकसंख्येची वाढ लक्षात घेता तसेच मोठया प्रमाणात होणारे नागरीकरण विचारात घेऊन नागरी संस्थांना मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्याकरिता "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM)" हाती घेतले आहे. सदर अभियानाचा कालावधी सन २०११-१२ पर्यंत आहे. सदर अभियानांतर्गत केंद्र शासन नागरी सुविधा विकसीत करण्यासाठी मोठया प्रमाणात आर्थिक निधी उपलब्ध करुन देत आहे. "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM)" या अंतर्गत नागरी पायाभूत सुविधा व प्रशासन (UIG) या उप-अभियानात राज्यातील एकूण ११ महानगरपालिका व ३ नगरपालिकांचा समावेश करण्यात आला आहे. "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM)" च्या UIG उपअभियानात समावेश न झालेल्या राज्यातील उर्वरित 'ड' वर्ग महानगरपालिकांचा व 'अ', 'ब' व 'क' वर्ग नगरपालिकांचा समावेश JNNURM च्या "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)" या उप-अभियानात करण्यात आला असून त्या अंतर्गत केंद्र शासन लहान व मध्यम शहरांसाठी नागरी सुविधा विकसित करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देत आहे.

०२. केंद्र शासनाने सन २००५-०६ मध्ये "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM)" व त्याअंतर्गत "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)" जाहीर करेपर्यंत राज्यात केंद्र शासन पुरस्कृत "एकात्मिक शहर विकास योजना (IDSMT)" ही कार्यरत होती. सन २००५-०६ मध्ये केंद्र शासनाने सदर योजना बंद करुन त्याऐवजी "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)" ही योजना JNNURM अंतर्गत सुरु केल्यामुळे केंद्र शासनाकडून केंद्र शासन पुरस्कृत "एकात्मिक

शहर विकास योजना (IDSMT)" या योजनेसाठी आता निधी उपलब्ध होत नाही. "केंद्र शासन पुरस्कृत "एकात्मिक शहर विकास योजना (IDSMT)" या योजनेतील अपूर्ण कामे राज्य शासनाने नागरी संस्थांच्या / राज्य शासनाच्या स्त्रोतातून पूर्ण करावीत असेही केंद्र शासनाने कळविले आहे. एकात्मिक शहर विकास योजनेअंतर्गत प्रगती पथावर असलेल्या प्रकल्पांचा आढावा घेतला असता २७ प्रकल्पांसाठी एकुण रु. २२.११ कोटी एवढया रकमेची आवश्यकता आहे.

०३. केंद्र शासनाने सन २००५-०६ साली "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM)" व त्याअंतर्गत "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)" जाहीर केल्यानंतर राज्यातील महानगरपालिका/ नगरपालिकांनी सन २००५-०६ व २००६-०७ मध्ये त्या वेळच्या दरसूची प्रमाणे (Schedule of Rates) सविस्तर प्रकल्प अहवाल तयार केले व केंद्र शासनाकडे मान्यतेस्तव पाठविले होते. यापैकी अनेक प्रकल्प मंजूर होऊन त्यांना निधी उपलब्ध होण्यासाठी जवळपास दोन वर्षांचा कालावधी लागला असल्यामुळे अशा प्रकल्पांची निविदा प्रक्रिया ही सन २००७-०८ व २००८-०९ मध्ये सुरु करण्यात आली. सदर दोन वर्षाच्या कालावधीत दरसूची मध्ये मोठया प्रमाणात वाढ झाली असल्यामुळे सदर प्रकल्पांच्या किमतीमध्ये देखील वाढ झाली आहे. केंद्र शासनाने प्रकल्पाच्या मूळ सविस्तर प्रकल्प अहवालाप्रमाणे रक्कम मंजूर केल्यानंतर दरसूची मध्ये झालेल्या वाढीमुळे प्रकल्पावरील खर्चातील वाढ राज्य शासन आणि संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था यांनी सोसावी अशी भूमिका घेतल्यामुळे या वाढीव रकमेचा आर्थिक भार हा संबंधित महानगरपालिका व नगरपालिकांवर पडलेला आहे. राज्यातील 'ड' वर्ग महानगरपालिका व नगरपालिका या दरसूचीतील वाढीमुळे पडणारा आर्थिक भार उचलू शकत नसल्यामुळे सदर प्रकल्प वेळेत पूर्ण करणे अवघड झालेले आहे. सदर प्रकल्प वेळेत पूर्ण व्हावेत व त्यांचा लाभ या शहरांमधील जनतेस व्हावा म्हणून 'ड' वर्ग महानगरपालिका व नगरपालिका यांनी "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM) (UIG उपअभियान)" व "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)" याअंतर्गत घेतलेले प्रकल्प पूर्ण करण्यासाठी राज्य शासनाकडून पूरक अनुदान / कर्ज देणे आवश्यक झाले आहे. विशेष म्हणजे केंद्र शासनाने या पुढे अशा सर्व प्रकल्पांच्या दुस-या हप्त्याची रक्कम वितरीत करण्यापूर्वी सर्व नागरी संस्थांनी अशा योजनेखाली हाती घेतलेल्या प्रकल्पांकरिता पूर्ण वित्तीय व्यवस्था (financial closure) केल्याबाबतचे प्रमाणपत्र केंद्र शासनास द्यावे, असे सूचित केले आहे

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

१) "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM) (UIG उपअभियान)" व "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम

(UIDSSMT)" या कार्यक्रमाअंतर्गत सोबतच्या परिशिष्ट I व II मध्ये दर्शविलेल्या मंजूर प्रकल्पांसंदर्भात फक्त दरसूचीतील फरकामुळे सदर प्रकल्पांच्या अंदाजपत्रकीय किंमतीत होणारी वाढ याची ५०% रक्कम पूरक अनुदानाच्या स्वरुपात राज्य शासनाकडून संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच केंद्र शासन पुरस्कृत "एकात्मिक शहर विकास योजना (IDSMT)" या योजनेअंतर्गत पूर्वी मंजूर मात्र अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी आवश्यक रक्कमेच्या ५०% रक्कम पूरक अनुदानाच्या स्वरुपात राज्य शासनाकडून संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना उपलब्ध करुन देण्यात येईल. "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM) (UIG उपअभियान)" व "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)" या कार्यक्रमाअंतर्गत मंजूर कामांकरिता राज्य शासनाकडून या निर्णयाच्या आधारे देण्यात येणाऱ्या पूरक अनुदान रकमेचे वितरण केंद्र शासनाकडून दुस-या हप्त्याच्या अनुदानाचे वितरण झाल्यानंतर तसेच दुसऱ्या हप्त्याच्या अनुदानाचा संपुर्ण खर्च झाल्यानंतर करण्यात येईल.

"जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM)" व "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)" या कार्यक्रमांतर्गत सोबतच्या परिशिष्ट-I व II मधील मंजूर प्रकल्पांकरिता दरसूचीतील वाढीमुळे रु.१३४३.३२ कोटी वाढीव खर्च व IDSMT खाली सोबतच्या परिशिष्ट III मध्ये दर्शविलेली अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी रु.२२.११ कोटी खर्च आवश्यक आहे.वरील निर्णयाच्या अनुषंगाने वर्ष २००९-१० मध्ये नगर विकास विभागाने :-

"मागणी क्र. एफ-२,३१, सहाय्यक अनुदान,२२१७,नगर विकास, ८०, सर्वसाधारण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगर विकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे, इत्यादींना सहाय्य,(००)(५८) JNNURM/UIDSSMT/ IDSMT योजनांतर्गत प्रकल्पांची कामे पूर्ण होण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांना पूरक अनुदान (२२१७८०३९) "

या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित केलेली रु.१६० कोटीची रक्कम सोबतच्या परिशिष्ट I, II व III मधील मंजूर प्रकल्पांवर ५०% पूरक अनुदानाचा हिस्सा म्हणून वापरण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर कामांकरिता उर्वरित ५०% पूरक अनुदानाची रक्कम पुढील २ वर्षात प्रतिवर्षी रु.२६१.३५ कोटी याप्रमाणे नगर विकास विभागास उपलब्ध होणा-या नियतव्ययातून अर्थसंकल्पीत करुन संबंधित म.न.पा./न.पा. यांना या निर्णयाच्या अनुषंगाने उपलब्ध करुन देण्यात येईल.

२) "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान (JNNURM) (UIG उपअभियान)" व "लहान व मध्यम शहरांसाठी पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT)" याअंतर्गत मंजूर प्रकल्पांसंदर्भात फक्त दरसूचीतील फरकामुळे सदर प्रकल्पांच्या अंदाजपत्रकीय किंमतीत होणा-या वाढीच्या उर्वरित ५०% रक्कम तसेच केंद्र

शासन पुरस्कृत एकात्मिक शहर विकास योजना (IDSMT) या योजनेअंतर्गत पूर्वी मंजूर मात्र अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी आवश्यक रक्कमेच्या उर्वरित ५०% रक्कम संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी मागणी केल्यास त्यांना कर्जाच्या स्वरुपात खालीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

I) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रात असणा-या 'ड'- वर्ग महानगरपालिका व नगरपालिका यांना मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) कडून कर्ज उपलब्ध करुन देण्यात येईल.

II) राज्यात इतरत्र असणा-या 'ड' - वर्ग महानगरपालिका व नगरपालिका यांना महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्क्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लिमिटेड (MUIDCL) या शासनप्रणीत कंपनीमार्फत कर्ज उपलब्ध करुन देण्यात येईल. मात्र, महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्क्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लिमिटेड (MUIDCL) या कंपनीला मुंबई महानगर प्राधिकरण क्षेत्रात असणा-या 'ड'- वर्ग महानगरपालिका व नगरपालिका यांना देखील कर्ज उपलब्ध करुन देण्याची मुभा असेल.

३) "महाराष्ट्र अर्बन इंन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड (MUIFTCL)" या शासनप्रणीत कंपनीस त्याच्या सहयोगी कंपनी "महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्क्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लिमिटेड (MUIDCL)" या संस्थेमार्फत संबंधित महानगरपालिका व नगरपालिका यांना कर्ज पुरवठा करणे सुकर व्हावे यासाठी " महाराष्ट्र अर्बन इंन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड (MUIFTCL)" या कंपनीच्या नियंत्रणाखाली असलेल्या "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा निधी" (MUIF) मध्ये शासन व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्या समप्रमाणात सहभागाने रु.५०० कोटी मात्रचा कायम निधी (Corpus Fund) निर्माण करुन त्याआधारे Project Finance Fund Scheme कार्यान्वित करण्यासंदर्भात "महाराष्ट्र अर्बन इंन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड (MUIFTCL)" व त्याच्या सहयोगी "महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्क्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लिमिटेड (MUIDCL)" यांनी ठराव केला असून त्यासंदर्भात शासनास विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने या शासन निर्णयान्वये उपरोल्लेखित Corpus Fund मध्ये आपला सहभाग म्हणून रुपये २५० कोटी एवढा निधी MUIF मध्ये देण्यास मान्यता देत आहे.त्यानुसार शासनाचा रुपये २५० कोटी रकमेचा हिस्सा नगर विकास विभागाने :-

"मागणी क्र.एफ-२, ३१, सहाय्यक अनुदान, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००)(४६) महाराष्ट्र नागरी मूलभूत सुविधा निधी (२२१७१३९३)"-

या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या निधीतून वितरीत करण्याचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) यांनी MUIF मध्ये वरीलप्रमाणे निर्माण करावयाच्या रुपये ५०० कोटींच्या Corpus Fund मध्ये त्यांचा रुपये २५० कोटी रकमेचा हिस्सा त्वरीत वर्ग करावा असे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम,१९७४ च्या कलम १६ क अन्वये त्यांना निर्देशित करण्यात येत आहे. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) यांनी त्यानुसार कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७९/१४४३, दिनांक २९/७/२००९ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०८/०९/व्यय-३, दिनांक ३१/८/२००९ अन्वये प्राप्त अभिप्रायांचा विचार करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

31/8/2009

**( मनु कुमार श्रीवास्तव )**
**सचिव**
**नगर विकास विभाग**

प्रत,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.राज्यमंत्री (न.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, (फोर्ट), मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र अर्बन इंन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र अर्बन इंफ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लि.
आयुक्त व संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
सह सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (नवि-९) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (नवि-३३)

**शासन निर्णय क्रमांक: एनयुआर-२००९/प्र.क्र.१२७/०९/नवि-३३**
**दिनांक : ३१ ऑगस्ट,२००९ सोबतचे परिशिष्ट-I**

(रु.कोटींत)

| अ.क्र. | शहराचे नांव | प्रकल्पाचे नांव | केंद्र शासनाने मंजूर केलेली किंमत |
|---|---|---|---|
| १ | कल्याण-डोंबिवली | Strom Water Drainage | ५५. ४२ |
| २ | कल्याण-डोंबिवली | Under Ground Drainage | १६९. ६३ |
| ३ | कल्याण-डोंबिवली | 150 mld. Water Supply Scheme | १०६. ८१ |
| ४ | कल्याण-डोंबिवली | Augmentation of Water Supply system | २५३. ५९ |
| ५ | उल्हासनगर | Water Supply | १२७. ६५ |
| ६ | कुळगांव-बदलापूर | Under Ground Sewerage Project | १५१. ४६ |
| ७ | मिरा-भाईंदर | Under Ground Sewerage Project on decentralised system | ३३१. ४२ |
| ८ | नांदेड | Improvement in movement network in Nanded city Package (NAD-06) | ६१. ०८ |
| ९ | नांदेड | Improvement to Water Supply in North Nanded (NAD-08) | ९०. ८७ |
| १० | नांदेड | Improvement to Sewerage system in North Nanded Zone I (NAD-09) | ४०. २५ |
| ११ | नांदेड | Improvement to Sewerage system in North Nanded Zone I (NAD-11) | ४८. ८९ |
| १२ | नांदेड | Improvement to Sewerage system in North Nanded Zone I (NAD-12) | ३९. ३१ |
| १३ | नांदेड | Improvement to Water Supply South Nanded Zone I (NAD-13) | ४९. ४५ |
| १४ | नांदेड | Under Ground Sewerage and Sewerage treatment in Nanded (NAD-13) | ४०. ९३ |
| १५ | नांदेड | Improvement of Road network in Nanded city Package (NAD-14) | २१४. ९७ |
| १६ | नांदेड | Improvement of Road network in Nanded city Package IIIB Structures (NAD-15) | ५८. १५ |
| १७ | नांदेड | Godavari River front Development in Nanded City (North Bank Zone.3)(NAD-016) | ४३. १३ |

| शासन निर्णय क्रमांकः एनयुआर-२००९/प्र.क्र.१२७/०९/नवि-३३ दिनांकः ३१ ऑगस्ट,२००९ सोबतचे परिशिष्ट-II | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | शहराचे नांव | प्रकल्पाचे नांव | केंद्र शासनाने मंजूर केलेली किंमत (रु. कोटीत) |
| १ | लातूर | Construction & Improvements of of Drains/strom water drain | ५५.३१ |
| २ | लातूर | Improvement of arterial Sub.arterial roads | ३५.९१ |
| ३ | लातूर | Construction of road divider and footpaths | ८.८ |
| ४ | लातूर | Beautification Of Golai | ०.६३ |
| ५ | लातूर | 6 Lane road with Joggers track from Rail station to Shivail chowk | ७. ५५ |
| ६ | लातूर | Parking Plaza at Ganjgolai | ०.३७ |
| ७ | कोल्हापूर | Water supply scheme | ५८.४४ |
| ८ | कोल्हापूर | Mahalakshmi Temple Parisar Development | १. ०१७ |
| ९ | कोल्हापूर | Under Ground Drainage scheme | ३१.९८ |
| १० | सांगली | Water supply scheme | ७९.०२ |
| ११ | सांगली | Under Ground Drainage scheme | २४.२५ |
| १२ | इस्लामपूर | Water supply scheme | १४.५४ |
| १३ | पुसद | Water supply scheme | ८.३९ |
| १४ | आष्टा | Water supply scheme | ६.७३ |
| १५ | चोपडा | Water supply scheme | ४.८६ |
| १६ | मंगळवेढा | Water supply scheme | ७.९६ |
| १७ | अंबड | Under Ground Drainage scheme | ८.११ |
| १८ | मोर | Water supply scheme | ३.१९ |
| १९ | भद्रावती | Water supply scheme | १७.५३ |
| २० | सावनेर | Under Ground Drainage scheme | ६.३१ |
| २१ | मालेगांव | Water supply scheme | ४६.११ |
| २२ | चिपळूण | Water supply scheme | ९.५६ |
| २३ | बीड | Water supply scheme | २०.७६ |
| २४ | बारामती | Water supply scheme | १३.६८ |
| २५ | अचलपूर | Water supply scheme | ३७.५९ |
| २६ | अहमदनगर | Water supply scheme | २५.३९ |
| २७ | नंदुरबार | Water supply scheme | २५.९३ |
| २८ | शिरुर | Sewerage scheme | ८.८९ |
| २९ | श्रीरामपूर | Water supply scheme | ४३.५७ |
| ३० | उमरेड | Water supply scheme | १५.६१ |
| ३१ | विटा | Water supply scheme | ७.४७ |
| ३२ | आर्वी | Water supply scheme | ७.२९ |
| ३३ | सातारा | Water supply scheme | ४७.१५ |
| ३४ | अमरावती | Sewerage scheme | १६० |
| ३५ | जालना | Water supply scheme | १२३.९९ |
| ३६ | तासगांव | Water supply scheme | १४.५६ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३७ | सोलापूर | Water supply scheme | ७१.९८ |
| ३८ | वैजापूर | Water supply scheme | ३८.२५ |
| ३९ | शेगांव | Water supply scheme | ४२.१८ |
| ४० | खामगांव | Water supply scheme | ४४.८७ |
| ४१ | उस्मानाबाद | Water supply scheme | १०३.४९ |
| ४२ | बसमत | Water supply scheme | ३२.१३ |
| ४३ | हिंगोली | Water supply scheme | ४५.७६ |
| ४४ | शहादा | Water supply scheme | १७.२४ |
| ४५ | जामनेर | Water supply scheme | ७.६८ |
| ४६ | इचलकरंजी | Water supply scheme | ३६.९३ |
| ४७ | अकोट | Water supply scheme | १९.५७ |
| ४८ | अंमळनेर | Water supply scheme | २४.८७ |
| ४९ | चाळीसगांव | Water supply scheme | ४.०७ |
| ५० | दापोली | Water supply scheme | १.४२ |
| ५१ | जिंतूर | Water supply scheme | ९.०९ |
| ५२ | खेड | Water supply scheme | २९.१ |
| ५३ | करमाळा | Water supply scheme | ९.४ |
| ५४ | कुर्डूवाडी | Water supply scheme | ७.६७ |
| ५५ | मनमाड | Water supply scheme | ३.३६ |
| ५६ | मुर्तिजापूर | Water supply scheme | १७.६७ |
| ५७ | पारोळा | Water supply scheme | ४.०३ |
| ५८ | पाथरी | Water supply scheme | १०.४३ |
| ५९ | शेलू | Water supply scheme | ११.८९ |
| ६० | सांगोला | Water supply scheme | २१.४५ |
| ६१ | सिल्लोड | Water supply scheme | १२.३६ |
| ६२ | सोनपेठ | Water supply scheme | २.९८ |
| ६३ | त्र्यंब्हारा | Water supply scheme | ६.१४ |
| ६४ | वाशिम | Water supply scheme | २९.९७ |
| ६५ | यवतमाळ | Water supply scheme | १०.९६ |
| ६६ | बेलापूर | Water supply scheme | ६.०५ |
| ६७ | काटोल | Water supply scheme | १९.१८ |
| ६८ | जयसिंगपूर | Water supply scheme | ६.९१ |
| ६९ | अंबेजोगाई | Water supply scheme | ११.०२ |
| ७० | हदगांव | Water supply scheme | २.१४ |
| ७१ | फलटण | Water supply scheme | ३२.८५ |
| ७२ | गडहिंग्लज | Water supply scheme | ८.९८ |
| ७३ | वडगांव | Water supply scheme | ६.६४ |
| ७४ | जुन्नर | Water supply scheme | ६.६१ |
| ७५ | रहिमतपूर | Water supply scheme | ४.०४ |
| ७६ | पेण | Water supply scheme | १२.९७ |
| ७७ | खोपोली | Water supply scheme | १४.८३ |
| ७८ | पाचोरा | Water supply scheme | १८.१८ |
| ७९ | संगमनेर | Water supply scheme | ८.७८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ८० | येवला | Water supply scheme | १०.१३ |
| ८१ | अहमदनगर | Water supply scheme | ७३.०५ |
| ८२ | अकोला | Under Ground Drainage scheme | १३२.७५ |
| ८३ | पाचगणी | Under Ground Drainage scheme | ३.२ |
| ८४ | पंढरपूर | Under Ground Drainage scheme | ३१.७५ |
| ८५ | चंद्रपूर | Under Ground Drainage scheme | ७२.०१ |
| ८६ | दौंड | Under Ground Drainage scheme | १९.१६ |
| ८७ | पनवेल | Under Ground Drainage scheme | ३१.०७ |
| ८८ | मालवण | Under Ground Drainage scheme | १८.८४ |
| ८९ | वेंगुर्ला | Under Ground Drainage scheme | ७.९५ |
| ९० | अलिबाग | Under Ground Drainage scheme | १२.४ |
| ९१ | कामठी | Under Ground Drainage scheme | २२.२१ |
| ९२ | औरंगाबाद | Water supply scheme | ३५९.६७ |
| ९३ | गोंदिया | Water supply scheme | ६१.३८ |
| ९४ | परभणी | Water supply scheme | १०४.४८ |

**शासन निर्णय क्रमांकः एनयुआर-२००९/प्र.क्र.१२७/०९/नवि-३३**
**दिनांक : ३१ ऑगस्ट,२००९ सोबतचे परिशिष्ट-III**

(रु. लाखात)

| अ.क्र. | शहराचे नांव | प्रकल्पाचे नांव | केंद्र शासनाने मंजूर केलेली किंमत |
|---|---|---|---|
| १ | उस्मानाबाद | I.D.S.M.T. अंतर्गत विविध कामे | ३६७. ६१० |
| २ | भंडारा | --"-- | ४१८. ५९० |
| ३ | पांढरकवडा | --"-- | २२४. ७२० |
| ४ | अचलपूर | --"-- | ३७९. २४० |
| ५ | बार्शी | --"-- | ३६७. ६९० |
| ६ | पंढरपूर | --"-- | ५३९. २७० |
| ७ | तुमसर | --"-- | २४८. ३०० |
| ८ | सावदा | --"-- | १२१. ७२० |
| ९ | पवनी | --"-- | २०७. ००० |
| १० | वेंगुर्ला | --"-- | ११४. ४७० |
| ११ | धर्माबाद | --"-- | २००. ००० |
| १२ | सातारा | --"-- | ४९२. ९९० |
| १३ | अहमदपूर | --"-- | १९३. ९४० |
| १४ | पुसद | --"-- | ३८४. ७८० |
| १५ | अक्कलकोट | --"-- | २५९. १०० |
| १६ | चिपळूण | --"-- | ३७२. ००० |
| १७ | मलकापूर | --"-- | ५७८. ६६० |
| १८ | हिंगणघाट | --"-- | ४५०. ००० |
| १९ | कळमेश्वर | --"-- | ९८. ९९० |
| २० | जव्हार | --"-- | १०२. ८५० |
| २१ | वणी | --"-- | २३२. ९१० |
| २२ | बुलढाणा | --"-- | ३६९. ००० |
| २३ | चांदूरबाजार | --"-- | ९१. ००० |
| २४ | खापा | --"-- | ७३. ०२० |
| २५ | लोणावळा | --"-- | २५०. ००० |
| २६ | खोपोली | --"-- | १८९. ७४० |
| २७ | मालेगांव | --"-- | ६५०. ७४० |

-------

E: Cabenet-ABC/CR-128- Annexture-I.lwp